राष्ट्रीय आयुष मिशन कार्यक्रमांतर्गत ३० खाटांचे आयुष रुग्णालय पुणे, नंदुरबार, अहमदनगर व सिंधुदुर्ग येथे बांधण्याकरीता प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयुष -१०१८/प्र.क्र.५२६/आरोग्य -७**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १७ डिसेंबर, २०१८.

**वाचा :-**

१) केंद्र शासनाचे पत्र क्र.D.O.No.R.१४०१२/१३/२०१८-H & D Cell, दिनांक २४/१०/२०१८.
२) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे पत्र क्र.राआसो/आयुष/प्रशामा/आयुष रुग्णालय/८२८९०-९२/ २०१८, दिनांक २९ ऑक्टोंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आयुष मिशन कार्यक्रमांतर्गत ३० खाटांचे आयुष रुग्णालय बांधण्याकरीता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रस्ताव आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास सादर केलेला आहे. सदर प्रस्तावास केंद्र शासनाने राज्य वार्षिक कृती आराखडा (SAAP) सन २०१७-१८ अंतर्गत मंजुरी दिलेली आहे. त्यामुळे सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यालयातर्फे प्राप्त झालेल्या प्रस्तावानूसार राष्ट्रीय आयुष मिशन अंतर्गत सन २०१७-१८ या वर्षात राज्य वार्षिक कृती आराखडा (State Annual Action Plan) अन्वये राज्यातील पुणे, नंदुरबार, अहमदनगर व सिंधुदुर्ग या चार जिल्ह्यात ३० खाटांचे आयुष रुग्णालय बांधण्याकरीता केंद्र शासनाची मंजुरी मिळालेली आहे. सदर रुग्णालयाच्या बांधकामाकरीता प्रति रुग्णालय रु.८.९९ कोटीचा कृती आराखडा सादर करण्यात आलेला आहे. सदर निधीपैंकी सन २०१७-१८ मध्ये प्रति रुग्णालय रु.१०० लक्ष याप्रमाणे रु.४०० लक्ष एवढा निधी

बांधकामासाठी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुषंगाने राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यालयाकडून सदर चार आयुष रुग्णालयांचा सविस्तर प्रकल्प अहवाल (Detailed Project Report) आयुष मंत्रालय, नवी दिल्ली यांना ई-मेलद्वारे सादर करण्यात आलेला आहे.

२. राष्ट्रीय आयुष मिशन अंतर्गत आयुष रुग्णालयाचे बांधकाम राज्यस्तरावरील पायाभूत सुविधा विकास कक्ष, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्यामार्फत करण्यात येणार आहे. त्यानुषंगाने सदर आयुष रुग्णालयांच्या बांधकाम निविदा, देखरेख व देयक अदायगी इ. बाबी राज्यस्तरावरील पायाभूत सुविधा विकास कक्ष, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्यातर्फे करण्यात येईल. यास्तव, पुणे, नंदुरबार, अहमदनगर व सिंधुदुर्ग या चार जिल्ह्यामध्ये बांधण्यात येणाऱ्या ३० खाटांच्या खालील आयुष रुग्णालयाच्या बांधकामासाठी खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | बांधकामासाठीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता |
|---|---|---|
| १ | पुणे | रु.८,९९,५१,७९३/- |
| २ | नंदुरबार | रु.८,९९,५१,७९३/- |
| ३ | अहमदनगर | रु.८,९९,५१,७९३/- |
| ४ | सिंधुदुर्ग | रु.८,९९,५१,७९३/- |

वरील जिल्ह्यांना प्रत्येकी रु.८,९९,५१,७९३/- (रुपये आठ कोटी नव्याण्णव लक्ष एकावन्न हजार सातशे त्र्याण्णव फक्त) खर्चास प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१) सदरहू चार आयुष रुग्णालयांचे बांधकाम निविदा प्रक्रिया राबवून करण्यात यावी.
२) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मार्गदर्शक सूचनेनूसार कामे करण्यात यावी.
३) प्रस्तुत अंदाजपत्रकासाठी खाजगी वास्तुशास्त्रज्ञांनी तयार केलेले सुनियोजित आराखडे, नकाशे यावर मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई या सक्षम अधिकाऱ्याची मंजुरी घेणे बंधनकारक आहे.
४) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
५) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

६) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र. १७७/तां.क. १, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) नगरपालिका, महानगरपालिका यांच्याकडून आवश्यक त्या सर्व मंजुरी घेण्यात याव्यात.

३. सदर प्रस्तावावरील खर्च केंद्र शासनाने ५० खाटापर्यंतच्या आयुष रुग्णालयाच्या बांधकामासंदर्भात राज्य वार्षिक कृती आराखडा अंतर्गत (SAAP) राज्य आयुष सोसायटीस मंजुर केलेल्या तरतूदीतुन भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201812151508346817 असा आहे. हा शासन निर्णय आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S. A. Pedgaonkar

Digitally signed by S. A. Pedgaonkar
DN: CN = S. A. Pedgaonkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice And Special Assistance Department
Date: 2018.12.17 13:13:41 +05'30'

**( सु. अ. पेडगांवकर )**

**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३) संचालक आयुष, आयुष संचालनालय, मुंबई.
४) अधिक्षक अभियंता, पायाभुत सुविधा कक्ष, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५)उप संचालक, आरोग्य सेवा, नाशिक परिमंडळ, नाशिक.
५) उप संचालक, आरोग्य सेवा, पुणे परिमंडळ, पुणे.
६) उप संचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर परिमंडळ, कोल्हापूर.
७) उपसचिव (आरोग्य-७), सार्वजनिक आरोग्य विभाग मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
८)निवडनस्ती (आरोग्य-७)